

# श्री सद्गुरु टुर्स ॲण्ड ट्रॅव्हल्स,पुणे

साई विहार सोसायटी , कर्वे नगर , पुणे – ५२

# अक्कलकोट –कडगंची - गाणगापूर – कुरवपूर - पिठापूर

श्री क्षेत्र कुरवपूर आणि श्री क्षेत्र पिठापूर ही श्रीदत्तत्रेयांचे अवतार श्रीपाद श्रीवल्लभ यांच्या अवतारांशी निगडीत दैवी अनुभूती करुन देणारी दत्त क्षेत्र आहेत. श्रीपादश्रीवल्लभांचा जन्म आंध्र प्रदेशामध्ये पिठापूर येथे झाला आणि त्यांच्या लीला आणि अवतार समाप्ती कुरवपूर याठिकाणी झाली. वयाची सोळा वर्षे झाल्यानंतर ते पिठापूर येथून निघाले आणि संपूर्ण भारतभ्रमण करुन ते कुरवपूर याठिकाणी आले. कुरवपूर अथवा कुरुगड्डी हे रायचूर तालुक्यात कर्नाटक आणि आंध्र राज्यांच्या सीमा भागात कृष्णा नदीच्या पात्रातील एक बेट आहे. येथे जाण्यासाठी कृष्णा नदीतून बुट्टीतून जावे लागते. येथे श्रीपादश्रीवल्लभांच्या पादूका असून प.प. टेंबेस्वामींची गुहा आहे. या गुहेतून प.पू. श्रीधर स्वामींनी देखिल वास्तव्य केले आहे. कुरवपूर याच ठिकाणी प.प. टेंबेस्वामींनी सर्वसामान्य आबाल वृद्धांना संकटातून मुक्त करणाऱ्या घोरकष्टोध्दरण स्तोत्राची रचना केली आहे. या ठिकाणी नित्य पुजा अर्चा अभिषेक आनि अनुष्ठाने इ. विधी केले जातात. पालखी सेवा हे इथले एक वैशिष्ट्य आहे. हे स्थान अतिशय प्राचीन आणि जागृत असून तेथिल अनुभूती वैशिष्ट्यपूर्ण आहेत. कुरवपूर येथे श्रीपादश्रीवल्लभ पादुका मंदिर, प.प. टेंबेस्वामींची गुहा, पंच पहाड, सुर्यनमस्कार शीळा आणि प्राचीन वटवृक्ष यांचे दर्शन घेता येते.

श्रीक्षेत्र पिठापूर पिठीकापुरम या नावानेही ओळखले जाते. आंध्र प्रदेश येथे पूर्व गोदावरी जिल्हामध्ये पिठापूर हे क्षेत्र आहे. पिठापूर या क्षेत्री श्रीपाद श्रीवल्लभ महासंस्थानची स्थापना झाली आहे. श्रीपादांच्या जन्म ठिकाणी मंदिर आणि पादूका असून त्याठिकाणी नित्य पुजा अर्चा सेवा सुरु आहे. श्रीपादश्रीवल्लभ जन्म ठिकाणा जवळ पादगया हे क्षेत्र आहे. हे तीर्थ म्हणजे तलाव असून तेथेच कुक्कुटेश्वर मंदिर आहे. येथे शंकर पार्वती यांनी कोंबडा-कोंबडी या रुपाने काही काळ वास केला होता, अशी कथा आहे. याच परिसरामध्ये “तिन शीरे आणि चार हात” अशी श्रीदत्तत्रेयांची अतिशय देखनी मुर्ती आहे. जेव्हा गयासूरचा वध झाला तेव्हा त्याच्या पायाकडील भाग पिठापूर येथे पडला अशी श्रद्धा आहे म्हणूनच या ठिकाणाला पादगया किंवा दक्षिणगया असे म्हटले जाते. येथे आपल्या पूर्वजांसाठी श्राद्ध आणि तर्पण हे विधी केले जातात. श्रीपादांच्या लीला अतर्क्य आणि विलक्षण आहेत. कलियुगातील त्यांचे कार्य अतुलनीय आहे. त्याचे जीवन आणि लीला वर्णन श्रीपादश्रीवल्लभ चरित्रामृत या ग्रंथामध्ये आहे. पिठापूर येथे श्रीपाद श्रीवल्लभ महासंस्थान, पादगया तीर्थ, कुक्कुटेश्वर मंदिर, अन्नवरम इ. ठिकानांचे दर्शन घेता येते.

**अक्कलकोट –कडगंची - गाणगापूर –पिठापूर- कुरवपूर- २०२४**

- **यात्रा दिनांक :** ०१-०३-२०२५ ते ०८-०३-२०२५
- **यात्रा शुल्क :** २१,०००/- + ५ % GST
- **नोंदणीसाठी आगाऊ रक्कम** : ४२००/- प्रतिव्यक्ती (नॉन रिफंडेबल)

फोन नं.:जीवन धायगुडे:९४०४०३३२१४/९७६७११८८०४ अमृता जोशी:८९८३१९४१५४/७५८८१७५८१२
ईमेल:ssinternationaltat@gmail.com




# श्री सद्गुरु टुर्स अॅण्ड ट्रॅव्हल्स,पुणे

साई विहार सोसायटी , कर्वे नगर , पुणे - ५२


## अक्कलकोट - कडगंची - गाणगापूर -पिठापुर-कुरवपूर यात्रा क्रमांक ९१

**स्थलदर्शन :**

१. **अक्कलकोट** (स्वामी समर्थ वटवृक्ष मंदिर व समाधीस्थान)

२. **गाणगापूर** (दत्तात्रयांच्या निर्गुण पादुका)

३. **कडगंची** (जिथे गुरुचरित्र लिहिले गेले )

४ . **कुरवपूरम** ( श्रीपादश्रीवल्लभ कर्मभूमी )

५.**मंथनगड** (श्रीपादश्रीवल्लभ यांनी भक्ताला दर्शन दिले .)

६. **मंत्रालय** (राघवेंद्र स्वामी मंदिर)

७. **पिठापुरम** (श्रीपादश्रीवल्लभ जन्मभूमी )

८.**अन्नावरम** ( जिथे जगातील पहिली सत्यनारायण पूजापार पडली)

९. **कुक्कुटेश्वर मंदिर**

१०. **अनघालक्ष्मी मंदिर**

११. **कुंती माधव मंदिर**

१२.**गोपाळबाबाआश्रम**

१३. **लाड चिंचोळी** (श्रीधर स्वामी यांचे जन्म ठिकाण )

**१४. एश्वर्य अंबिका मंदिर**

**१५. रेपूर साईबाबा मंदिर (** ११६ फुट साईबाबांची मूर्ती **)**

**१६ . भावनारायण स्वामी मंदिर**

**१७. उप्पाडा गावात साडी खरेदी**

**१८. काकीनाडा समुद्रकिनारा**

**१९. कुमसी (त्रिविक्रम भारती यास विश्वरूप दर्शन)**



# श्री सद्गुरु टुर्स ॲण्ड ट्रॅव्हल्स,पुणे

साई विहार सोसायटी , कर्वे नगर , पुणे - ५२

**२०. माणिकनगर (हुमनाबाद)** (दत्तावतारी माणिकप्रभू यांचे मंदिर)

**यात्रा शुल्कामध्ये समाविष्ट घटक :**

- सर्व प्रवास खर्च : ३ टियर एसी रेल्वे कोच
- एक प्रवास नॉन एसी रेल्वे ने (2 तासांचा)
- स्थलदर्शनासाठी नॉन एसी वाहन (क्रुझर , तवेरा , रिक्षा अशा प्रकारच्या गाड्या)
- दररोज दोन पाण्याची बाटली
- दोन वेळचा चहा, सकाळी नाष्टा, दोन वेळचे जेवण
- रेल्वेमध्ये देखील घरगुती नाष्टा आणि जेवण दिले जाईल.
- राहण्याची सुविधा नॉन एसी रुम्स मध्ये २/३/४ शेरिंग बेसिस (ज्याप्रमाणे ग्रुप असेल त्याप्रमाणे)

**यात्रा शुल्कामध्ये असमाविष्ट घटक:**

- **रेल्वेतील चहा, पाणी बाटली (फक्त रेल्वेतील)**
- **कुरवपुर येथील होडी प्रवास खर्च**
- **हमाल**

**पिठापूर - कुरवपूर यात्रेचा कार्यक्रम (थोडक्यात माहिती ) :**

- **०१ मार्च** या तारखेला रात्री १० च्या रेल्वेने मुंबई वरून सोलापूरकडे प्रस्थान. (३ टियर AC क्लास)
- दिवस १ ला :
  - **०२ मार्चला** पुण्यावरून पहाटे ६ च्या शताब्दी एक्सप्रेस ट्रेनने सोलापूर कडे प्रस्थान.
  - मुंबई/पुण्यावरून ट्रेनने सोलापूर येथे पोहोचणे व अक्कलकोट कडे प्रस्थान
  - अक्कलकोट येथे दर्शन.
  - अक्कलकोट वरून दुपारी कुमसी येथे प्रस्थान.
  - कुमसी दर्शन व गाणगापूर कडे प्रस्थान.
  - गाणगापूर येथे संगम दर्शन व निर्गुण पादुका मठ दर्शन व मुक्काम.
- दिवस २ रा :
  - सकाळी गाणगापूरहुन कडगंची कडे प्रस्थान.
  - त्यानंतर लाड चिंचोली दर्शन.
  - पुढे माणिकनगर येथे माणिकप्रभू यांचे दर्शन.
  - गाणगापूर येथे मुक्काम
- दिवस ३ रा :
  - गाणगापूरवरून रेल्वेने कुरवपुर कडे प्रस्थान.(नॉन AC स्लीपर क्लास)

फोन नं.:जीवन धायगुडे:९४०४०३३२१४/९७६७११८८०४ अमृता जोशी:८९८३१९४१५४/७५८८१७५८१२
ईमेल:ssinternationaltat@gmail.com

- मंत्रालय दर्शन करून कुरवपुरम स्थळी जाणे.
- रात्रीच जेवण व कुरवपूर मुक्काम .

➢ दिवस ४ था :

- सकाळी चहा व नाष्टा व कुरवपुरमक्षेत्री दर्शन व अभिषेक.
- मंथनगुडी दर्शन
- रात्रीचे जेवण व पिठापूर कडे रेल्वेने प्रस्थान. (३ टियर AC क्लास)

➢ दिवस ५ वा :

- सकाळचा नाष्टा रेल्वेत.
- दुपारी पिठापुरम येथे पोहोचणे.
- अन्नावरम ,अनघा लक्ष्मी मंदिर दर्शन , कुक्कुटेश्वर मंदिर दर्शन , कुंती माधव मंदिर , गोपाळबाबा आश्रम दर्शन.
- रात्रीचे जेवण पिठापूरला करून मुक्काम करणे.

➢ दिवस ६ वा :

- १० वाजेपर्यंत दर्शन अभिषेक चहा व नाश्ता करणे
- ऐश्वर्य अंबिका मंदिर,रेपूर साईबाबा मंदिर ( ११६ फुट साईबाबांची मूर्ती ), भवनारायण स्वामी मंदिर येथे भेट देणे
- दुपारी काकीनाडा येथे दुपारचे जेवण करून उप्पाडा गावात साडी खरेदी करिता प्रस्थान.
- सर्व आटोपून ६ वाजेपर्यंत पिठापूर मंदिरात येणे.
- ७ वाजता मंदिरात अतिशय भव्य आणि नयनरम्य पालखी सोहळयासाठी उपस्थित राहणे.
- रात्री जेवण करणे.
- रात्री पिठापूर वरून पुणे/मुंबई कडे प्रस्थान (३ टियर AC क्लास)

➢ दिवस ७ वा :

- ०८/०३/२०२५ या तारखेला रात्री १२ ला पुण्याला पोहोचणे
- ०९/०३/२०२५ या तारखेला पहाटे ५ ला **मुंबईला ( LTT येथे )** पोहोचणे.

**यात्रा रद्द करण्याबाबत नियम :**

- बुकिंग करतेवेळी यात्रेच्या एकूण रक्कमेपैकी ४२०० रुपये रक्कम भरणे आवश्यक आहे.
- यात्रेकरूंच्या वैयक्तिक कारणांवरून यात्रेला येणे रहित झाल्यास कोणत्याही **कारणास्तव ॲडव्हान्स भरलेली रक्कम आपल्याला परत मिळणार नाही.**
- **ऐनवेळी महामारी,वादळ,पर्जन्यवृष्टी,पूर,भारतबंद,अशा नैसर्गिक किंवा मानवनिर्मित कारणाने यात्रा रद्द झाल्यास कोणत्याही परीस्थित आपण भरलेली आगाऊ रक्कम आपल्याला**

परत मिळणार नाही, अशावेळी आपण त्या नंतर यात्रा आयोजित केल्यावर त्यामध्ये सामील होऊ शकता. यामध्ये रेल्वेचे तिकीट रद्द करून परत मिळणारी रक्कम पुढील यात्रेत ग्राह्य धरली जाईल.

- उर्वरित रक्कम यात्रेच्या १५ दिवस आधी भरणे आवश्यक आहे.

**नोंदणी रद्द करण्याबाबतचा तक्ता :**

| दिवस | भरलेली रक्कम | परत मिळणारी रक्कम |
|---|---|---|
| नोंदणी करतेवेळी भरलेली रक्कम | ४२००/- | कोणत्याही कारणास्तव परत मिळणार नाही. |
| यात्रेला जाण्याच्या 11 ते 15 दिवस आधी | २२०५०/- | १३३९०/- |
| यात्रेला जाण्याच्या 5 ते 10 दिवस आधी | २२०५०/- | ८९२५/- |
| यात्रेला जाण्याच्या 2 ते 4 दिवस आधी | २२०५०/- | १७८५/- |
| यात्रेला जाण्याच्या 1 दिवस आधी | २२०५०/- | ०/- |

**पिठापुर - कुरवपूर यात्रेसंबंधित काही नियम व अटी:**

- यात्रेमध्ये मर्यादित जागा उपलब्ध असल्यामुळे "प्रथम येणाऱ्यास प्रथम प्राधान्य " या तत्वावर प्रवेश दिला जाईल .
- यात्रेला येताना स्वतःची माहिती देणारा फॉर्म भरणे आवश्यक आहे . हा फॉर्म आपल्याला whatsapp वर पाठवण्यात येईल. आपण फॉर्ममध्ये भरलेल्या माहितीची गुप्तता राखण्यात येईल . आपण दिलेली आपली वैयक्तिक माहिती आमच्याकडे सुरक्षित असेल.
- बुकिंग करतेवेळी यात्रेच्या एकूण रक्कमेपैकी ४२०० रुपये रक्कम भरणे आवश्यक आहे.
- हि रक्कम आपण रोखीने, चेकने किंवा ऑनलाईन ट्रान्सफर करून भरू शकता अथवा आमच्या बँक खात्यामध्ये जमा करू शकता .
- **यात्रा कालावधीपेक्षा जास्त दिवस आपल्याला राहायचे असल्यास त्याचे अतिरिक्त शुल्क आपल्याला द्यावे लागेल.**
- **यात्रेमध्ये आम्ही नियोजित केलेल्या सुविधांव्यतिरिक्त अन्य काही जास्तीच्या सुविधा आपणास हव्या असल्यास त्यावर देखील ५% GST आपल्याला भरावा लागेल. (उदा. २ टियर चे तिकिटे, एसी वाहन, एसी रूम्स इ.इ.)**
- आपले ओळखपत्र हे स्वत:सोबत ठेवणे बंधनकारक आहे .

- यात्रेमध्ये आपल्याला दररोज पहाटे उठावे लागते.
- **काही रेल्वे स्टेशन छोटे असल्यामुळे त्या ठिकाणी हमालाची व्यवस्था नसते,** त्यानुसार सर्वांनी आपल्याला झेपेल एवढेच सामान आणावे. शक्यतो चाकांची बॅग असावी म्हणजे कुठे हमाल मिळाला नाही तर सामान वाहून न्यायला त्रास होणार नाही.
- **यात्रेमध्ये सर्वांनाच लोवर बर्थ (रेल्वे मध्ये खालचे सीट ) मिळणे शक्य नाही**. शक्य तेवढ्या लवकर बुकिंग केल्यास लोवर बर्थ मिळवणे थोडे सोपे जाते. परंतु तरीही सर्वांनाच लोवर बर्थ मिळेल याची शाश्वती आम्ही देत नाहीत. तसेच ग्रुप असेल तर सर्वांनाच एकाच बोगी मध्ये सीट्स मिळतील याची शाश्वती देऊ शकत नाही
- **साईट सीइंग च्या वेळी वाहनांमध्ये आळीपाळीने पुढे मागे बसावे. कोणाचीही जागा निश्चित स्वरूपाची नाही. हे सर्वांनी आपापसात सामंज्यसाने ठरवावे.**
- आपणास कार्यक्रमाची रूपरेषा दिलेली आहे परंतु तरीही परिस्थितीनुरूप कार्यक्रमांच्या रुपरेषेत बदल होऊ शकतो, या बाबत कोणीही तक्रार करू नये.
- **संपूर्ण यात्रेदरम्यान आपल्याला आमच्या कंपनीमार्फत देण्यात येणारी टोपी डोक्यावर घालणे आवश्यक असते.**
- **जर आपणास कुठल्याही प्रकारचा आजार असल्यास त्याच्या संबंधित सर्व प्रकारचे औषध जवळ बाळगणे आवश्यक आहे.**
- **बहुतांश ठिकाणी अपंग तसेच वृद्ध व्यक्तींसाठी व्हील चेअर सारख्या सुविधा उपलब्ध असतीलच असे नाही,त्यामुळे अशा ठिकाणी प्रवाशांकडून सहकार्याची अपेक्षा असेल. तसेच परिस्थितीनुरूप कार्यक्रमांच्या रुपरेषेत बदल होऊ शकतो , या बाबत कोणीही तक्रार करू नये.**
- यात्रेला जाण्याच्या ठिकाणी नैसर्गिक स्थिती तसेच हवामानाच्या अवस्था लक्षात घेऊन सहलीच्या तारखांमध्ये फेरबदल करण्याचे अधिकार संस्थेला असतील. तारखांमध्ये बदल करण्यात येणार असेल तर त्याची माहिती १५ दिवस आधी प्रवाशांना देण्यात येईल , त्याबद्दल सहकार्याची अपेक्षा असेल.
- प्रवासादरम्यान कुठल्याही प्रकारचे धूम्रपान तसेच नशा करण्यास सक्त मनाई आहे. असे आढळयास योग्य ती कारवाई करण्याचे अधिकार संस्थेला आहेत.
- **प्रवासादरम्यान आपल्या सर्व वस्तूंची काळजी आपण घ्यावी. आपली कोणतीही वस्तू गहाळ झाल्यास अथवा नुकसान झाल्यास श्री सद्गुरू टूर्स त्याला जबाबदार राहणार नाही. प्रवासादरम्यान कुठल्याही प्रकारच्या मौल्यवान वस्तू स्वतःसोबत बाळगू नयेत असा आमचा वैयक्तिक सल्ला असेल.**
- **यात्रेमध्ये संस्थेने तयार केलेले नियम व शिस्त पाळणे बंधनकारक असेल.**
- प्रवासादरम्यान संस्थेने नेमून दिलेल्या स्वयंसेवकाच्या सूचना यात्रेकरूंनी पाळणे बंधनकारक असेल.

**पिठापुर - कुरवपूर यात्रे संदर्भात माहिती :**

- श्री सद्गुरू टूर्स अँड ट्रॅव्हल्स अंतर्गत आमची हि ९१ वी यात्रा आहे. आजपर्यंत ५४६० भक्तांना या यात्रांमधून श्रीपादश्रीवल्लभ दर्शनाचा लाभ झाला आहे.
- आपण सर्वजण दत्तदर्शनाला जात आहोत. दत्त महाराजांची इच्छा असल्याशिवाय त्यांचे दर्शन करणे शक्य नसते. आपण सर्व जण नशीबवान आहोत म्हणून आपल्या सर्वांना दत्त दर्शनाचा लाभ होणार आहे.
- देवदर्शन करण्यासाठी अथक परिश्रम करावे लागतात, महाराज पावलोपावली आपली परीक्षा बघत असतात. त्यामुळे देवदर्शन करतेवेळी आपण मनाने अतिशय स्थिर व प्रसन्न असणे आवश्यक आहे.
- या यात्रेमध्ये स्त्री व पुरुष दोघांनाही मुक्त प्रवेश आहे .
- **पिठापूर कुरवपुर दर्शन हि १००% धार्मिक यात्रा आहे. हि कोणतेही पर्यटन अथवा फिरायला जाण्याची ट्रीप नाही. त्यामुळे ज्यांची दत्त महाराजांवर अगाध श्रद्धा आहे त्यांनीच या यात्रेत सहभागी व्हावे.**
- संपुर्ण प्रवासात फक्त शाकाहारीच जेवण दिले जाईल .
- कुरवपूर व पिठापूर या दोन्हीही ठिकाणी रोज सकाळी सामूहिक पद्धतीने अभिषेक होतात.
- ज्यांना नियमित औषधे घ्यावी लागतात त्यांनी सुकामेवा, बिस्कीट अशे काही पदार्थ स्वत:सोबत बाळगावेत , कारण नाष्टा किंवा जेवणाच्या वेळा मागे - पुढे होऊ शकतात .
- आपण ज्या ठिकाणी जात आहोत ती अतिशय छोटी खेडेगाव आहेत. तिथे शहरांसारख्या सुखसोयी लवकर उपलब्ध होत नाहीत. महाराजांच्या भक्तांना कोणताही त्रास होऊ नये ह्याची जबाबदारी महाराजांनी आमच्यावर सोपवली आहे, त्यानुसार त्या लहानश्या खेड्यांमध्येही सुखसोयी उपलब्ध करून देण्याचे प्रयत्न आम्ही करतो. परंतु तरीही अचानक काही अडचणी आपल्या कडून सहकार्याची अपेक्षा असेल.
- सर्व ठिकाणी गरम पाणी,कमोड व बेड ची व्यवस्था केलेली आहे, परंतु काही वेळा चुलीची लाकडे संपली, लाईट गेली असल्यास गरम पाणी उपलब्ध करणे शक्य होत नाही. अशा अडचणी सहसा येत नाहीत परंतु आल्या तरी त्यावेळी तिथे सामंजस्याने वागावे.
- फक्त मुंबई येथून प्रस्थान करणाऱ्या यात्रेकरुनी सोलापूर येथे उतरल्यावर आपण अंघोळीसाठी व्यवस्था केलेली आहे, सोलापूर येथे आपल्याला फक्त अंघोळ करायची असल्यामुळे तिथे काही रूम्स घेतलेल्या असतात.
- कुरवपूर येथे उन्हाळयामध्ये कधी कधी कृष्णा नदीचे पाणी आटलेले असते त्यावेळी नदीच्या पात्रातून चालत जावे लागते. हे पात्र साधारण १ ते १.५ किमीचे आहे. नदीपात्रातून आपल्याला हाताला धरून नेण्यासाठी तेथील आदिवासी लोक मदत करतात, त्यांना आपल्या इच्छेनुसार आपण पैसे द्यावेत. पाणी असेल त्यावेळेस बोटने आपण मंदिरात दर्शनाला जातो.
- आमचे स्वयंसेवक हे आपल्यापेक्षा वयाने खुप लहान आहेत परंतु या यात्रांचा अनुभव त्यांना जास्त आहे त्यामुळे प्रत्येक यात्रेकरूंनी स्वयंसेवकांच्या सूचना पाळणे व सांगितलेल्या नियमांचे पालन करणे

बंधनकारक आहे. आपल्याला काहीही गैरसोय होत असल्यास तसे आपण स्वयंसेवकास सांगू शकता, त्याप्रमाणे आपल्याला मदत केली जाईल . यात्रेमध्ये कोणीही स्वयंसेवकांशी चढ्या आवाजात बोलणे, त्यांच्याशी भांडणे करणे असा व्यवहार करू नये. यात्रेमध्ये कोणीही आपापसात देखील भांडू नये.

- आमच्या संस्थेमार्फत आपल्याला साईड पर्स व डोक्यावरची कॅप भेट म्हणून दिली जाते. ज्यामध्ये आपण पाण्याची बाटली , नियमित गोळया, मेकअप चे सामान , चष्मा, हातरुमाल, पैसे अश्या वस्तू ठेऊ शकता.

**पिठापुर – कुरवपूर यात्रेसंबंधित काही महत्वाच्या सूचना :**

- संपूर्ण प्रवासादरम्यान रेल्वेत अथवा मंदिरात किंवा अन्य कुठल्याही ठिकाणी प्लास्टिक कचरा टाकू नये. रेल्वेमध्ये बेसिन च्या खाली कचऱ्याचा डब्बा असतो त्यामध्येच सर्व कचरा टाकावा. चहाचे कप, पाण्याच्या रिकाम्या बाटल्या, अन्नपदार्थांची रिकामी पाकिटे, प्लास्टिक पिशव्या , प्लेट्स अथवा कुठल्याही प्रकारचा कचरा हा एका पिशवी मध्ये साठवून ती पिशवी कचऱ्याच्या डब्यात टाकावी.
- **आपण जात असलेल्या ठिकाणी भात हेच मुख्य अन्न आहे. त्याप्रदेशात पोळया शक्यतो मिळत नाहीत. तिथे इडली,डोसे , मेदुवडे,सांबारभात,ताक भात अश्या पद्धतीनेच अन्न मिळते, तरीही आम्ही शक्य तिथे पोळया देण्याचा प्रयत्न करतो, परंतु तरीही काही ठिकाणी पोळया न मिळाल्यास कोणीही पोळी भाजी साठी हट्ट करू नये.**
- प्रवाश्यांचे कुठल्याही प्रकारचे नातेवाईक, मित्र, आप्तजन,स्वकिय अथवा ओळखीचे व्यक्ती ; जे आमच्या संस्थेमार्फत यात्रेला आलेले नाहीत, अश्या कुठल्याही व्यक्तीला रूम्स , रेस्टोरंटस किंवा साईट सिनिंग मध्ये प्रवेश दिला जाणार नाही. अश्या प्रकारे काही आढळयास प्रवाश्याना दंड करण्याचे सर्व अधिकार संस्थेला आहेत.
- यात्रेदरम्यान कुठल्याही प्रकारच्या राजकीय, भौतिक तसेच घरगुती विषयांवरील चर्चा कटाक्षाने टाळाव्यात .
- प्रवासादरम्यान तसेच संपूर्ण यात्रेमध्ये आम्ही नियोजित केलेल्या सहलीचे फ़ोटो व व्हिडिओ , संस्था आठवणी साठी संग्रहित करून ठेवते तसेच संस्थेच्या यात्रेविषयी प्रचार व प्रसारासाठी वापरू शकते. या बद्दल प्रवाशांना काही आक्षेप असल्यास त्याची तशी पूर्व कल्पना आम्हाला देणे.

**चला तर मग एकही क्षण न गमवता आजच मला फोन करा व आपली नोंदणी करा.**

**अधिक माहितीसाठी संपर्क :**

श्री सद्गुरू टुर्स अँड ट्रॅव्हल्स
विठ्ठल मंदिर रोड,
साई विहार सोसायटी , कर्वे नगर ,पुणे -५२
8983194154 / 9767118804

